ग्राहक संरक्षण कायदा १९८६ च्या तरतूदीनुसार जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंचाच्या अध्यक्ष या रिक्त पदावर नियुक्ती करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय, क्र.नियुक्ती-२०१८/प्र.क्र.१५/ग्रासं-४**
हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय (वि.), मुंबई-३२.
दिनांक:- २३ ऑगस्ट, २०१८

वाचा:- १) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ मधील नियम, २०००.
२) शासन निर्णय, समक्रमांक, दि.०५.०२.२०१८.
३) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.राआ/महा./आस्था- ३/भरती/२०१८/२९, दि.२९.०५.२०१८.

**शासन निर्णय:-**

ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ च्या तरतूदीनुसार ग्राहकांच्या तक्रारींचे निवारण करण्यासाठी राज्यामध्ये जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंचाची स्थापना करण्यात आली आहे. सदर अधिनियमाच्या कलम, १० च्या पोटकलम, (३) व कलम ३० चे पोटकलम (२) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन खाली नमूद करण्यात आलेल्या जिल्हा न्यायाधिश (निवृत्त) या प्रवर्गातील उमेदवारांची त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंचाच्या अध्यक्ष या रिक्त पदावर नियुक्ती याद्वारे करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **अध्यक्ष पदासाठी निवड झालेल्या जिल्हा न्यायाधिशांची (निवृत्त) नावे** | **अध्यक्ष या रिक्त पदावर पदस्थापना करण्यात आलेल्या जिल्हा मंचाचे नाव** |
|---|---|---|
| १. | श्री.कैलाश गोपीकिसन राठी | धुळे |
| २. | श्री.मुकुंद बाळकृष्ण दात्ये | लातूर |
| ३. | श्रीमती शुभदा दत्तात्रय तुळणकर | बीड |
| ४. | श्री.दिलीप वासुदेव देशपांडे | उस्मानाबाद |
| ५. | श्री.दिलीपकुमार दुबालाजी देशमुख | भंडारा |
| ६. | श्री.श्रीधर किशनराव कुलकर्णी | हिंगोली |

२. वरील अध्यक्षांची नियुक्ती त्यांनी विहीत नमून्यातील शपथपत्र व हमीपत्र राज्य आयोगास सादर केल्यानंतर व त्यांनी त्यांच्या पदाचा प्रत्यक्षात पदभार स्वीकारल्यानंतर प्रभावी होईल. सदरील अध्यक्ष पदावरील नियुक्ती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून, करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

अटी व शर्ती :-

१) सदर नियुक्तीकरीता त्यांनी अध्यक्ष पदाचा प्रत्यक्षात पदभार स्वीकारलेल्या दिनांकापासून १ वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी राहील. उमेदवाराची कामगिरी समाधानकारक नसल्याचे राज्य आयोगाच्या अध्यक्षांचे मत झाल्यास परिविक्षाधीन कालावधी वाढविण्यात येईल.

२) संबंधित उमेदवारांची नियुक्ती ही वैद्यकीय तपासणी व पोलीस पडताळणी अहवालाच्या अधिन राहून करण्यात येत आहे. तथापि, ज्या उमेदवारांचे पोलीस पडताळणी/वैद्यकीय तपासणी अहवाल प्रतिकुल असतील/त्यामध्ये काही प्रतिकुल शेरे नमूद केले असल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

३) जिल्हा मंचाच्या अध्यक्षाची नियुक्ती ५ वर्षासाठी किंवा त्यांच्या वयाची ६५ वर्ष होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तो पर्यंत राहील.

४) त्यांची पुर्ननियुक्ती करता येणार नाही किंवा त्यांना मुदतवाढ मिळणार नाही.

५) जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंचातील सदस्यांना महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० च्या नियम ३ मधील पोटनियम (१) मधील तरतूदी व सदर नियमामध्ये वेळोवळी केलेल्या सुधारणानुसार वेतन/मानधन अनुज्ञेय राहील.

६) जिल्हा ग्राहक मंचाच्या अध्यक्षांच्या सेवाविषयक अन्य बाबी किंवा शर्ती ग्राहक संरक्षण कायदा, १९८६ व नियम, २००० व शासनाने त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणेनुसार नियमित होतील.

७) जिल्हा मंचाचे अध्यक्ष जिल्हा मंचाच्या कामासाठी दौऱ्यावर असतांना राज्य शासनाचा प्रथमश्रेणी अधिकाऱ्यांना अनुज्ञेय दैनिक व प्रवास भत्ता मिळण्यास ते पात्र राहतील. परंतु, त्यांना विमान प्रवास तसेच, वातानुकूलित प्रथम वर्गाचा रेल्वे प्रवास अनुज्ञेय राहणार नाही.

८) महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० मधील नियम ३ (४) या तरतूदीनूसार संबंधित जिल्हा मंचाच्या अध्यक्षांना पदावरुन दूर करता येईल.

९) शासनाला आवश्यक वाटल्यास, संबंधित जिल्हा मंचाच्या अध्यक्षांच्या सेवा एका जिल्हा मंचातून दुसऱ्या जिल्हा मंचामध्ये लोकहितास्तव किंवा प्रशासकीय कारणास्तव बदली योग्य असतील किंवा कामाचा भार किंवा प्रलंबित प्रकरणे विचारात घेऊन राज्य आयोगाच्या शिफारशीनुसार दोन जिल्हा मंचांना जोडून त्यांच्या सेवेचा उपयोग शासन करुन घेईल.

१०) सदर नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांत संबंधितांनी पदभार न स्वीकारल्यास त्यांची नियुक्ती आपोआप रद्दबातल होईल.

११) सदर नियुक्ती कामाच्या व्यापाचा (work load) आढावा घेऊन, करण्यात येत आहे.

३. उपरोक्त बाबींसाठी होणार खर्च, मागणी क्र.एम-२ "२४०८-अन्न साठवण व वखार साठवण (०४) (००) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत राज्य ग्राहक संरक्षण परिषद, राज्य आयोग व जिल्हा मंचाची स्थापना करणे (०४) (०१) मुंबई शहर (२४०८०२५१) ०१ (वेतन व भत्ते)/मुफसल (२४०८०२६२) ०१ (वेतन व भत्ते) " या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेस्थळावर उपलबध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१८०८२४१३०८५२८४०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Bhaskar Baburao Patil

Digitally signed by Bhaskar Baburao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplier And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=bbb17268641691acddf048e6aa2150f79b022d09a6c745e92beb9baeed480e62,
serialNumber=c8c342ac9a89937bf462ee75f46842ac6d1fbc12a95dda7bfd1d06d7b79b4191, cn=Bhaskar Baburao Patil
Date: 2018.08.24 13:14:20 +05'30'

**(भा.बा.पाटील)**

उप सचिव, महारारष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
३) मा.मंत्री अनापुवग्रास यांचे खाजगी सचिव.
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद.
५) मा.राज्यमंत्री अनापुवग्रास यांचे खाजगी सचिव.
६) मा.अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
७) सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
८) प्रधान सचिव, (अ.ना.पु.व .सग्रा.सं.वि.) यांचे स्वीय सहायक.
९) प्रधान सचिव (विधी), विधी व न्याय विभाग.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ मुंबई,/नागपूर.
११) वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, मुंबई.
१२) प्रबंधक (प्रशासन), राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
१३) सर्व संबंधित नियुक्त अध्यक्ष.
१४) जिल्हा कोषागार कार्यालय, धुळे, लातूर, बीड, उस्मानाबाद, भंडारा व हिंगोली.
१५) निवडनस्ती, ग्रासं-४.